महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या/ नियुक्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांकः मविसे१०/प्र.क्र.९१/२०१४/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई-४०० ००१
तारीख: १७ सप्टेंबर, २०१४

संदर्भ:-

**शासन आदेश क्रमांकः मविसे१०/२०१४/प्र.क्र.७९/आस्था-३अ, दिनांक २९.५.२०१४**

**शासन आदेश:-**

उपरोक्त संदर्भाधीन आदेशान्वये श्री.एन.के.भांडारकर, सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, समुद्रपूर, जिल्हा वर्धा यांची बदली सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सावली, जिल्हा चंद्रपूर या पदावर करण्यांत आली होती. तथापि, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदी नुसार बदलीस करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्व मान्यतेने श्री.भांडारकर यांच्या उपरोक्त आदेशात अंशत: बदल करुन सहा.गट विकास अधिकारी, पंचायत समिती, गोंदिया, जिल्हा गोंदिया या रिक्त पदावर बदलीचे आदेश शासन देत आहे.

२. उपरोक्त आदेशातील नमूद अधिकाऱ्याने त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा. तसेच त्याने अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्याचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.:सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्याने नोंद घ्यावी.

३. उपरोक्त अधिकाऱ्याने नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१७१७१५५८०८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: CN = SHINDE VIJAY DATTATRAYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD, CID - 917064
Reason: I am approving this document
Date: 2014.09.17 18:21:31 +05'30'

**(वि.द.शिंदे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा/गोंदिया
३. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा/गोंदिया
४. महालेखापाल-२( लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
५. खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्राम विकास )
६. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री ( ग्राम विकास )
७. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक
८. संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
९. कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०.निवड नस्ती, का.क्र. आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.